शबरी आदिवासी घरकुल (शहरी) योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता सांगली जिल्ह्यातील जत नगरपरिषदेकरीता घरकुलांचे उद्दिष्ट निश्चित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्र. पारधी-२०१९ /प्र.क्र.२८/का-०८(भाग-२)
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२५

वाचा :-

१. आदिवासी विकास विभाग यांचे पत्र क्र. बीयुडी-२०११/प्र.क.१८९/का-०६ दि.२९.०४.२०११
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे पत्र क्र.नियो-२०११/प्र.क्र. /का-४(२) २८३३ दि.०५.०२.२०११
३. प्रकल्प अधिकारी, ए.आ. वि. यो. घोडेगाव क्र.विकेस-२०१२/प्र.क्र/का.४(१)६८९ दि. २१.०३.२०१२
४. प्रकल्प अधिकारी, ए.आ. वि. यो .घोडेगाव यांचे क्र.विकेस-२०१३/प्र.क्र/पारधी /का.४(१) १३० दि. ०८.०१.२०१३
५. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.आविवि-०२२३/प्र.क्र.३०/का-०८, दि.११ जानेवारी, २०२४

**प्रस्तावना-**

शबरी आदिवासी घरकूल योजनेसाठी वाचा क्र.१ च्या पत्रान्वये सांगली जिल्ह्यातील पारधी समाजाच्या लाभार्थ्यांसाठी ४०० घरकुलांना मान्यता देण्यात आली होती. तसेच वाचा क्र.३ व ४ अन्वये अनुक्रमे १०० व २०० घरकुलांच्या बांधकामाचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. सदर ३०० घरकुलांपैकी १०७ घरकुलांचे काम अद्याप सुरू झाली नसल्याने, सदर घरकुलाची कामे शबरी आदिवासी घरकुल योजना(शहरी) अंतर्गत वाचा क्र.५ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. शबरी आदिवासी घरकूल योजनेतंर्गत (शहरी) सन २०२४-२५ आर्थिक वर्षासाठी प्रकल्प कार्यालय, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव अंतर्गत सांगली जिल्ह्यातील जत नगरपरिषदेकरीता मंजुर केलेली तथापि अद्याप सुरू न झालेली १०७ घरकुलांची कामे दि.११.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये शबरी आदिवासी घरकुल योजना (शहरी) अंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहून पूर्ण करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर घरकुलांसाठी यापूर्वीचे मंजूर केलेला रू.१.०७ कोटी इतका निधी शबरी आदिवासी घरकुल योजना (शहरी) अंतर्गत आता मंजूर घरकुलांसाठी वापरण्यास मान्यता देण्यात येत असून या योजनेतंर्गत अनुज्ञेय उर्वरित रक्कम रू.१.५० लक्ष प्रति घरकुल शबरी आदिवासी घरकुल योजना (शहरी) अंतर्गत लेखाशिर्ष २२२५G०३६ ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) मधून उपलब्ध करून देण्यात येईल.

३. सदर घरकुलांना मान्यता मिळून बराच कालावधी झालेला असल्याने सदर १०७ लाभार्थी सद्यस्थितित शबरी आदिवासी घरकुल योजना (शहरी) अंतर्गत दि.११.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद पात्रता अटी पूर्ण करत आहेत, याची खातरजमा संबंधित प्रकल्प कार्यालय, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव यांनी करावी. या अटींच्या अधीन राहून उपरोक्त शासन निर्णयास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३३११४३७३५७१२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAGHUVIR DHONDIRAM KATKE

Digitally signed by RAGHUVIR DHONDIRAM KATKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=6f594954bd799968aa50aaa40154cd3ad3a036295890af4cd43ec c9f22dcb87a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7AFD3F6D4FAA0E6C98E10D28DC71B935654C783F039 7A6CDBEFAEB5F6EEF9DA, cn=RAGHUVIR DHONDIRAM KATKE
Date: 2025.03.31 14:38:15 +05'30'

**( रघुवीर धों. कटके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
८. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव ,मंत्रालय,मुंबई.
९. मा. मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा. सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव.मंत्रालय,मुंबई.
११. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२
१२. मा. सर्व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
१३. मा. विधानसभा / विधान परिषद, सदस्य सर्व
१४. मुख्य सचिव,यांचे उप सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. अ.मु.स./प्र.स./सचिव,विभाग सर्व ,मंत्रालय मुंबई.
१६. विभागीय आयुक्त, पुणे.
१७. जिल्हाधिकारी, सांगली
१८. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
२०. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव
२१. मुख्याधिकारी,नगरपरिषद, जत जिल्हा सांगली
२२. अवर सचिव (का-६),(अर्थसंकल्प) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.मुंबई
२३. निवड नस्ती/ (का-०८),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय.मुंबई